**मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची "डब्ल्यू" मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभागांचे नुतनीकरण करण्याबाबतचे धोरण.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीएमसी-२५२४/प्र.क्र.८१(भाग-१)/नवि-२१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४

**संदर्भ:-**
१. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८
२. नगरविकास विभाग, शासन निर्णय क्र.बीएमसी-२५१६/प्र.क्र.२८०/नवि-२१, दि.१५.०३.२०१७
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जमीन-२५१२/०८/प्र.क्र.५१/ज-२, दिनांक २३.०६.२०१७
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जमीन-२५१२/०८/प्र.क्र.५१/ज-२, दिनांक १६.११.२०१८

**प्रस्तावना:-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची "डब्ल्यू" मध्ये नमूद केलेल्या मालमत्ता शासनाच्या असून या मालमत्ता, बृहन्मुंबई महानगरपालिकेस सुपूर्द (vest) केल्या आहेत. सदर मालमत्ता बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत विविध कालावधीकरीता मक्त्याने देण्यात येतात. मक्ता कालावधी संपुष्टात आल्यानंतर मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ मधील कलम ९१(ब)(२) अन्वये विहित केलेल्या तरतूदींनुसार या मालमत्तांची मालकी आपोआप शासनाकडे येते. त्यामुळे या मालमत्तांच्या मक्त्यांच्या नुतनीकरणाबाबतचे धोरण शासनामार्फत निश्चित होणे आवश्यक आहे. त्यानुसार मंत्रिमंडळाच्या निर्णयानंतर अनुसूची "डब्ल्यू" मध्ये नमूद मालमत्तांच्या नुतनीकरणाबाबत संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, नगरविकास विभाग दि.१५.०३.२०१७ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. सदर धोरणात महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग या मालमत्तांचे नुतनीकरण हे शासनाच्या मान्यतेने करण्यात येईल. तसेच, अशा प्रकारे नुतनीकरण करण्यासाठी भाडेपट्टयाच्या रकमेचे दर, त्याची आकारणी व परिगणना याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील, असे विवक्षितपणे नमूद केले आहे.

उपरोक्त पार्श्वभूमीवर बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात जिमखान्यांना/क्लबला भाडेपट्टयाने देण्यात आलेल्या अनुसूची "डब्ल्यू" मधील शासकीय जमिनींच्या भाडेपट्टा नुतनीकरणाबाबत सर्वसमावेशक सुधारीत धोरण विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात

मंत्रिमंडळाच्या दि.११.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत प्राप्त मंजुरीस अनुसरून बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात अनुसूची “डब्ल्यू” मधील भाडेपट्टयाने दिलेल्या जमिनींच्या भाडेपट्टयाचे नुतनीकरण व तद्नुषंगिक विषयांच्या अनुषंगाने शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

०२. बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची डब्ल्यू मध्ये नमूद केलेल्या शासकीय जमिनींवर असलेल्या जिमखान्यांचे/क्लबचे वर्गीकरण त्यांना भाडेपट्टयाने दिलेल्या जमिनींच्या क्षेत्रफळाच्या आधारावर खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | क्षेत्रफळ मर्यादा | जिमखान्याचा वर्ग |
|---|---|---|
| १ | २०,००० चौ.मी. पेक्षा अधिक | “अ” वर्ग |
| २ | १०,००० चौ.मी. ते २०,००० चौ.मी. | “ब” वर्ग |
| ३ | १०,००० चौ.मी. पेक्षा कमी | “क” वर्ग |

०३. शासकीय जमिनींवरील जिमखान्यांचे वर्गीकरण वरीलप्रमाणे क्षेत्रफळाच्या आधारे करून ज्या अशा जिमखान्यांचा/क्लबचा भाडेपट्टा संपुष्टात आलेला आहे त्या भाडेपट्टयांचे नुतनीकरण खालील अटी व शर्तीवर तसेच, आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना योग्य वाटतील अशा अन्य सुसंगत अटींवर शासन मान्यतेने करणे अनुज्ञेय असेल :-

## अटी व शर्ती :-

१. जिमखान्यांच्या भाडेपट्टयांचे **मानीव नुतनीकरण**, भाडेपट्टा संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून दि.३१.१२.२०१६ पर्यंत विहित नियम व तरतुदीनुसार तत्कालीन प्रचलित दरांनुसार, त्याचप्रमाणे, तद्नंतर, म्हणजेच दि.०१.०१.२०१७ पासून सुधारित दरानुसार भुईभाडे आकारण्यात येवून त्याच्या फरकाच्या रकमेची वसुली करण्यात यावी. अशा पध्दतीने वार्षिक भुईभाड्याची आकारणी करताना **थकीत भुईभाड्यावर व्याज आकारण्यात येऊ नये.**
२. जिमखान्यांच्या भाडेपट्टयांचे **मानीव नुतनीकरण** करतांना, सदर भाडेपट्टा करार संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून ते नुतनीकरण करावयाच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीकरिता, सदर भूखंडाचा वापर केल्यामुळे सदरहु कालावधीसाठी भाडेपट्ट्याने दिलेल्या संपूर्ण भूखंडाच्या क्षेत्राचे भाडेकरारनामा नूतनीकरण करून भूईभाड्याची विहित नियमानुसार आकारणी व वसूली करण्यात यावी.
३. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ मधील कलम ९१(ब)(२) अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार अनुसूची “डब्ल्यू” मध्ये विनिर्दिष्ट केलेली कोणतीही जमीन ३० वर्षांपेक्षा अधिक होणार नाही, इतक्या मुदतीकरिता, सदर अधिनियमातील कलम ९१(क) मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या प्रयोजनांसाठी मुंबई महानगरपालिकेला नव्याने भाडेपट्ट्याने देणे राज्य शासनाकरिता कायदेशीर असेल आणि त्यांनतर, ती जमीन महानगरपालिकेकडे पुनर्निहित होईल.

४. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ मधील कलम ९१(ब)(४) अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार महानगरपालिकेस, प्रत्येक १० वर्षानंतर भाडेपट्ट्याच्या दरामध्ये सुधारणा करता येईल; परंतु, अशा दरांमध्ये सुधारणा करतेवेळी महानगरपालिका, शासनाची जमीन भाडेपट्ट्याने देण्याकरिता शासनाच्या महसूल व वन विभागाने ठरविलेल्या धोरणाचे पालन करण्यासाठी बांधील असेल.

५. महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ च्या नियम-७ मध्ये दि. ३१ डिसेंबर, २०१५ रोजीच्या अधिसूचनेन्वये करण्यात आलेली सुधारणा विचारात घेता, जिमखान्यांना/क्लबला दिलेल्या शासकीय जमिनीच्या भाडेपट्टयाचे नुतनीकरण करतांना सदरहु नुतनीकरण हे विहित नियमानुसार महत्तम ३० वर्षांच्या कालावधीसाठी करण्यात यावे. तसेच, यासंदर्भातील कार्यवाही करतांना संबंधित जिमखान्याला भाडेपट्टयाने दिलेल्या शासकीय जमिनींवर दि.१ जानेवारी, २०१७ नंतरच्या कालावधीसाठी अनुज्ञेय होणाऱ्या **भुईभाड्याची आकारणी व वसुली** ही वार्षिक मुल्य दर तक्त्यातील अशा जमिनींच्या किमतीच्या **१०%** रकमेवर खालील दराने विहित नियमानुसार करण्यात यावी.

i) "अ" वर्गीकरणाखालील जिमखान्यांना -उक्त रकमेच्या १% दराने

ii) "ब" वर्गीकरणाखालील जिमखान्यांना -उक्त रकमेच्या ०.५% दराने व

iii) "क" वर्गीकरणाखालील जिमखान्यांना- उक्त रकमेच्या ०.२५% इतक्या दराने

६. वरील अट क्र. (५) मध्ये निश्चित होणाऱ्या भुईभाड्यात दर वर्षी **४%** इतकी वाढ करण्यात यावी.

७. दि.१ जानेवारी, २०१७ नंतर दर दहा वर्षांनी संबंधित जिमखान्यांस भाडेपट्टयाने दिलेल्या शासकीय जमिनीच्या त्यावेळी प्रचलित बाजार मुल्य दर तक्त्यातील किंमतीचा आधार घेवून, वरील अट क्र. (५) प्रमाणे निश्चित केलेले वार्षिक भुईभाडे आणि उक्त अट क्र. (६) प्रमाणे त्या वर्षाचे येणारे वार्षिक भुईभाडे यापैकी जी रक्कम जास्त असेल त्यानुसार वार्षिक भुईभाड्याची परिगणना करुन आकारणी व वसुली करण्यात यावी.

८. जिमखान्यांना भाडेपट्टयाने देण्यात आलेल्या शासकीय जमिनीवर जिमखान्यांनी अस्तित्वातील बांधकामांचा पुनर्विकास करण्यासाठी तसेच नवीन बांधकाम करण्यासाठी शासनाची आणि संबंधित नियोजन प्राधिकरणाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

९. महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम क्लब यांच्या मक्ता कराराचे प्रथम नूतनीकरण करताना/नवीन मक्ता करार करताना, मा.मुख्यमंत्री यांना ५० आजीवन (निःशुल्क) सदस्य नामनिर्देशीत करण्याचा अधिकार असेल. मा.मुख्यमंत्री यांना प्रत्येक वर्षी महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम क्लब मध्ये ३ आजीवन (निःशुल्क) सदस्य नामनिर्देशीत करण्याचा अधिकार असेल.

१०. जिमखान्याच्या/क्लबच्या व्यवस्थापकीय समितीवर आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका हे पदसिध्द सभासद राहतील.

११. जिमखान्याच्या **एकूण सभासद संख्येच्या ५% सभासद** केंद्र शासनाच्या/राज्य शासनाच्या/बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सेवेतील "अ" वर्ग अधिकाऱ्यांमधून **"सर्व्हिस मेंबर्स"** म्हणून घेणे आवश्यक असेल.

असे सदस्यत्व सदरहू अधिकारी संबंधित जिल्ह्यात नियुक्त असतानाच्या कालावधीसाठी असेल. तसेच, **"सर्व्हिस मेंबर्स"** यांचे सदरहु सदस्यत्व हे नि:शुल्क असेल. त्याचप्रमाणे, उक्त ५% मर्यादेस अधीन राहून शासन शिफारस करेल अशा केंद्र शासनाच्या/राज्य शासनाच्या/बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सेवेतील "अ" वर्ग अधिकाऱ्यांना "सर्व्हिस मेंबर" म्हणून घेणे संबंधित जिमखान्यावर/क्लबवर बंधनकारक राहील.

१२.महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम क्लब यांच्याशी संबंधित कामकाजाचे प्रभावीपणे समन्वय साधण्याकरिता सदर महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम क्लबमध्ये प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई व उप सचिव (नवि-२१/बृहन्मुंबई महानगरपालिका कार्यासन), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे पदसिध्द सदस्य असतील व त्यांनी यासंदर्भात वेळोवेळी प्राधिकृत केलेले सक्षम प्राधिकारी अनुषंगिक बैठकांना उपस्थित राहण्यास पात्र राहतील.

१३.शासकीय जमिनी भाडेपट्टयाने देण्यात आलेल्या जिमखान्यांना महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना व नियोजन अधिनियम, १९६६ मधील कलम ३७ (अ) अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार जिमखान्याच्या मैदानावर क्रिडेतर कार्यक्रम घेण्यास मुभा राहील. असे क्रिडेतर कार्यक्रम आयोजित करण्यापूर्वी संबंधित जिमखान्यांनी त्या बाबत आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना पूर्वसूचना देणे आवश्यक राहील व त्यासाठी विहित केलेले अनुज्ञप्ती शुल्क आगाऊ भरणे जिमखान्यांवर बंधनकारक राहील. **मैदानाचा / मोकळया जमिनीचा क्रिडेतर वापर एका कॅलेंडर वर्षामध्ये ४५ दिवसांपेक्षा जास्त असू शकणार नाही.** जिमखान्यांचे मैदान क्रिडेतर कार्यक्रमांसाठी आरक्षित करण्याची **ऑनलाईन सुविधा** उपलब्ध करुन देणे अशा जिमखान्यांवर बंधनकारक असेल.

१४. शासनाने जिमखान्यांना भाडेपट्टयाने मंजूर केलेले मैदान महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना व नियोजन अधिनियम, १९६६ मधील कलम ३७ (अ) अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार वार्षिक मर्यादेस अधिन राहून क्रिडेतर प्रयोजनासाठी भाड्याने देण्यासाठी खालीलप्रमाणे **अनुज्ञप्ती शुल्क** वसूल करण्यात यावे :-

(i) बृहन्मुंबई महानगरपालिकेने विहित केलेल्या धोरणानुसार मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्ह्यांमध्ये क्रिडेतर प्रयोजनासाठी संबंधित जिमखान्याकडून पुढे नमूद तक्त्यातील रक्कम यापैकी जी रक्कम **जास्त** असेल ती रक्कम **अनुज्ञप्ती शुल्क** म्हणून बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारे आकारण्यात यावी.

| अ.क्र. | **जिमखान्याचे वर्गीकरण** | **क्रिडेतर कार्यक्रमाकरिता प्रतिदिन आकारावयाची अनुज्ञप्ती फी** |
|---|---|---|
| १ | “अ” वर्ग | रु.१५,००,०००/- |
| २ | “ब” वर्ग | रु.१०,००,०००/- |
| ३ | “क” वर्ग | रु.५,००,०००/- |

(ii) जिमखान्याने एकाच दिवशी एकापेक्षा जास्त क्रिडेतर कार्यक्रम मैदानावर आयोजित केल्यास अशा प्रत्येक क्रीडेतर कार्यक्रमासाठी वरीलप्रमाणे स्वतंत्र अनुज्ञप्ती शुल्क आकारण्यात यावे.

(iii) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना पूर्वसुचना न देता व आवश्यक अनुज्ञप्ती फी आगाऊ जमा न करता जिमखान्याने मैदानावर क्रिडेतर कार्यक्रम आयोजित केला तर अशा कार्यक्रमासाठी मूळ अनुज्ञप्ती शुल्का बरोबर **तितकीच दंडाची रक्कम** भरणे संबंधित जिमखान्यावर बंधनकारक राहील.

१५.जिमखान्यांना भाडेपट्टयाने प्रदान करण्यात आलेली शासकीय जमीन **एका कॅलेंडर वर्षात ७ दिवस** शासकीय व सार्वजनिक प्रयोजनासाठी तथा शासन पुरस्कृत कार्यक्रमासाठी प्राधान्यपुर्वक व **विनामोबदला** वापरण्याचे शासनास अधिकार राहतील आणि याबाबत राज्य शासन व आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचा निर्णय जिमखान्यांवर बंधनकारक राहील.

१६.जिमखान्यांमध्ये आयोजित क्रिडेतर कार्यक्रमाकरीता जिमखाना ठरविल त्यानुसार केटरर्स/डेकोरेटर्स यांचे कंत्राटदारांमार्फत सेवा घेण्याची सक्ती करता येणार नाही. **असे कंत्राटदार निवडण्यास कार्यक्रम आयोजकांना मुभा देणे जिमखान्यावर बंधनकारक राहील.**

१७.प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीच्या तरतूदीस अधीन राहून जिमखान्यांचा **वाणिज्यिक** तसेच इतर तत्सम अनुषंगिक वापर हा नियोजन प्राधिकरण, आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, तसेच, शासनाच्या पूर्वपरवानगीने करणे अनुज्ञेय राहील.

१८. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या **अनुसूची "डब्ल्यू"** मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग तसेच अनुसूची "डब्ल्यू" मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या इतर सर्व भूभागांचे **भाडेपट्टयांचे करार करतांना अथवा सदर भाडेपट्टा करारांचे नुतनीकरण** करतांना अनुषंगिक अटींबाबत माहिती देऊन व संबंधितांचे रितसर म्हणणे ऐकून घेऊन, त्यासंदर्भातील प्रस्तावांवर शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतर, आवश्यक ती अनुषंगिक कार्यवाही करण्यासाठी आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१९.सदरचे धोरण हे अनूसूची "डब्ल्यू" मधील महानगरपालिकेच्या अखत्यारीखालील शासकीय जमिनीवरील सर्व जिमखान्यांना तसेच मोकळ्या जागांना (Open spaces) लागू राहील.

२०.मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या **अनुसूची "डब्ल्यू"** मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग तसेच अनुसूची "डब्ल्यू" मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या इतर सर्व मालमत्तांच्या संदर्भातील भाडेपट्टयांचे करार करतांना / सदर भाडेपट्ट्यांचे नुतनीकरण करतांना संबंधित भाडेपट्टा करारामध्ये या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या उक्त सर्व तरतुदींचा विवक्षितपणे अंतर्भाव करण्यात यावा.

२१.मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या **अनुसूची "डब्ल्यू"** मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग तसेच अनुसूची "डब्ल्यू" मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या इतर सर्व

भूभागांवर आयोजित करण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांसंदर्भातील महसूल वसूलीबाबतचा, सदर भूखंडाबाबत उद्भवणाऱ्या विविध समस्यांबाबतचा, तसेच, अनुषंगिक बाबींसंदर्भातील आढावा बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या स्तरावर वेळोवेळी व प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या स्तरावर प्रत्येक तीन महिन्यांच्या कालावधीत घेण्यात येईल.

०४. सदर शासन निर्णय, महसूल व वन विभाग, वित्त विभाग तसेच विधी व न्याय विभागांनी दिलेल्या अभिप्रायानुसार, तसेच, दि.११.०३.२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१११५०४३७७१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOVINDARAJ KORAMANNA HIRANYA GOWDA

Digitally signed by GOVINDARAJ KORAMANNA HIRANYA GOWDA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=10a32fa5e4e3aa5a8332798cc4e6ba14f319051955769f69e69187ed22d67f03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4B6A32EE2B0D37280E72D06B8D130B85460D5AD93BDAC010E0B42FDCCD8715E6, cn=GOVINDARAJ KORAMANNA HIRANYA GOWDA
Date: 2024.03.14 15:26:06 +05'30'

**(डॉ. के. एच. गोविंदराज)**
**प्रधान सचिव (नगर विकास-२)**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव. राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. सभापती, विधान परिषद/ मा. अध्यक्ष, विधानसभा,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा.
५. मा. सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिवांचे सह सचिव.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -२ नागपूर.
९. मा. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१०.शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
११.मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रातील सर्व महानगरपालिका आयुक्त.
१२.आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१३.महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१४.जिल्हाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगरे जिल्हा.
१५.सर्व सहसचिव /उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास मंत्रालय, मुंबई.
१६.निवडनस्ती(कार्या-नवि-२१)